## श्रीधर तिळवे यांचे प्रकाशित साहित्य

एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्गार (काव्यसंग्रह)

टीकाहरण (समीक्षा)

Kavi
(Marathi Poetry)
Shridhar Tilve

क.व्ही.
(म-९९२)
पॉप्युलर प्रकाशन

ISBN 81-7185-827-9



पहिली आवृत्ती : २००४ / १९२६

मुखपृष्ठ : षांताराम पवार

प्रकाशक
रामदास भटकळ
पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि.
३५ सी, पं. मालवीय मार्ग
ताडदेव, मुंबई ४०० ०३४
E-mail : info@popularprakashan.com

अक्षरजुळणी
ऑलरीच एण्टरप्रायझेस
जी-८, सुमित सदन
भागोजी कीर मार्ग
माहीम, मुंबई ४०० ०१६

मुद्रक
क्रिएटिव्ह क्रिएशन
११ए, रामनिवास,
जेकब सर्कल
मुंबई ४०० ०११

सौ. नलिनी शांताराम तिळवे (आई)
श्री. शांताराम श्रीधर तिळवे (भाऊ)
अर्पण करावं म्हणून आजूबाजूला पाहिलं तर कुणी दिसलं नाही
म्हणून पुन्हा तुम्हांलाच–

## *काही शब्द*

'एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्गार' ह्या संग्रहानंतर माझा हा दुसरा कवितासंग्रह. त्याला 'क.व्ही.' असे नाव दिले आहे. क.व्ही. म्हणजे कवितेचे, कलेचे, कवीचे, कलावंताचे कवितेतील, कलेतील वगैरे वगैरेतील व्हिजन. सध्याच्या संस्कृतीचे दोन आयाम आहेत- टेलिव्हिजन आणि कम्प्युटर. टेलिव्हिजन हा जास्त पॅसिव्ह तर कम्प्यूटर हा जास्त ॲक्टिव. मी काहीसा पॅसिव्ह एजन्ट आहे आणि एकेकाळी टीव्हीचा ॲडिक्टही होतो. त्याचे प्रतिबिंब ह्या संग्रहात आहे. 'क.व्ही.' हे टेलिव्हिजनिक कवीचे व कवितेचे रूप होय. त्यामुळे बराच विचार करून शेवटी हे नाव फायनल केले.

आधुनिक काळ हा काहीसा एकसंध 'मी'चा होता तर उत्तर आधुनिक काळ हा 'मी'च्या अंताचा होता. आमचा काळ हा ना एकसंध 'मी'चा आहे ना 'मी'च्या अंताचा; तो 'मी'चा 'मी'च्या अनेक क्लोन्सचा, अनेक 'मीं'चा कालखंड आहे. आधुनिक काळात एकसंध 'मी', त्याला आलेले विखुरलेपण, त्याचा समाजाबरोबरचा संघर्ष अशा अनेक समस्या भेडसावत होत्या. मी ज्या काळात कविता लिहितोय किंवा माझे अनेक मी ज्या काळात कविता लिहितायत किंवा माझे अनेक मी ज्या काळात माझ्यात एकत्र बसून कविता लिहितायत त्या काळात ह्या अनेक 'मीं'चे इंटरनेटिंग कसे करायचे, त्यांच्या आयडेंटीज कशा फील

करायच्या किंवा डील करायच्या असे अनेक प्रश्न सातत्याने उपस्थित होत आहेत. कधी हा 'मी' हायकिंग करत उंच कड्यावर विमुक्त होत जातो तर कधी माणूस आणि विश्व ह्यांच्यात सवते सुभे थाटून होस्टेलच्या खोलीत बंदिस्त, स्वतःच्या आळसात बसतो. कधी टाईम कील करत आयुष्याचा एम्प्टिनेस फील करतो तर कधी अनेक रूपे धारण करून स्वतःतून उडतो, स्वतःत बसतो. हे मी अनेक मी होतात, एकमेकांशी भांडतात आणि हे सगळे पुन्हा एका 'मी'तच होते. तो कुणासारखा होईल, कुठे वाहत जाईल हे सांगणे कठीण. कुणा'सारखे' होणे हेही इथलेच आणि हे सगळे 'सारखे' जळून गेले तरी पुन्हा शिल्लक राहावे हेही इथलेच. त्याला पेप्सी-कोक-एमटीव्ही ह्यांच्या मोहातून कधी कधी मुक्तता मिळते आणि मग तो नुसता असतो. एरव्ही इन्फर्मेशन टेक्नॉलॉजीच्या प्रचंड जाळ्यात आपण सूर्यासारखे आहोत हे स्पष्ट आणि स्वच्छ सत्यही त्याला दिसत नाही. चक्रधरांच्या आंधळ्यांसारखी अनेकदा अवस्था होते. ह्या 'मी'चा कधी फक्त पाय हाती लागतो तर कधी सोंड. सायबरकॅफे म्हणजे अशा अनेक आंधळ्यांचा लाईनअप. ह्यातील एखाद्या 'मी' चा मृत्यू दुसरा 'मी' टीव्हीवरील शॉट पाहावा तसा पाहणारा 'आपुले मरण पाहिले म्या डोळा, तो टीव्हीसोहळा अनुपम्य'! सध्याचा काळ हा नेटवर्क्सचा आणि ह्या 'मी' पुढे त्यामुळेच स्पायडरमॅन होण्याखेरीज पर्याय उरलेला नाही. हा नेटवर्क्सचा चक्रव्यूह आणि त्यातून अनेक 'मी'सकट चालत जाणे हे माझे 'अढळ' आहे ह्या 'मीं'चे 'अटळ' आहे.

व्यक्तिमत्त्वात जसे अनेक 'मी' आहेत तसेच भाषेबाबतही अनेक 'मी' आहेत. मराठी भाषिक 'मी', हिंदी भाषिक 'मी', इंग्रजी भाषिक 'मी'– ह्या तिन्हींना इंटरनेट करणारा मी. मी जेव्हा महाविद्यालयात होतो तेव्हा इंग्रजीचा कट्टर विरोधी होतो.

English isn't a language–
It's a food, clothes and shelter.
When somebody speaks in English
It's sure that
He has enough food, clothes and shelter.
So it's really difficult to write about hunger
When you write in English.
English isn't a language.
It's a class
Who has everything.
English is a power
Which rules the Non-English people.
So when I write in English
I become a powerful person.
English is not a cup of my language.

ही माझी ह्या काळात भावना होती पण हळूहळू ती बदलत गेली. इंग्रजी व हिंदी ह्या देशाच्या दोन मार्गी भाषा आहेत हे मी स्वीकारले. मात्र मराठी हीच माझी खरी अभिव्यक्ती आहे. मी ज्या व्यवसायात वावरतो तिथे मराठीला काहीच स्थान नाही. तिथला सर्व व्यवहार इंग्रजी किंवा हिंदीत. त्यामुळे माझ्या कवितांवर ह्यांचाही परिणाम आहेच.

ह्या साऱ्यांना रसिकांसमोर मांडताना एखादी वेगळी मांडणी हवी म्हणून मग टेलिव्हिजनचा ढाचा उचलला. मला वावरताना नेहमीच मी एक टेलिव्हिजन आहे आणि समोरच्या माणसाच्या गरजेप्रमाणे आणि माझ्या मूडप्रमाणे वेगवेगळी चॅनेल्स प्रक्षेपित करतो असा फील असतो. हा संग्रहही असा अनेक चॅनेल्समध्ये त्यामुळेच प्रक्षेपित केलाय. माझ्या काव्यलेखनाची सुरुवात ग़ज़लांनी झाली म्हणून आरंभ ग़ज़लांनी केलाय. तो काहीजणांना आवडणार नाही पण मला अजून तरी ग़ज़लेचा विटाळ झालेला नाही.

मी ज्या काळात कविता लिहितोय तो कवितेसाठी अत्यंत क्रायसिसचा काळ. एक प्रकारचे मृत्यूपर्व सर्वत्र थैमान घालतंय. सब्जेक्ट इज डेड, हिस्ट्री इज डेड, आयडिऑलॉजी इज डेड, ऑथर इज डेड असे अनेक मृत्यू घोषित होत आहेत. दि. धो. कुलकर्णीसारख्या कवीचा प्रत्यक्ष मृत्यू तर सर्वच काळात असतो. पण त्याबरोबरच परंपरेचा मृत्यू, त्या परंपरेची स्थापना हत्तीत करणाऱ्या देशीवाद्यांचा मृत्यू, प्रत्यक्ष कवीचा कवितेत होणारा मृत्यू, ज्या भाषेत मी कविता लिहितोय त्या मराठी भाषेचा मृत्यू आणि शेवटी घोषित झालेला लेखकाचा मृत्यू. आपण साक्षात जिवंत असताना आपल्या मृत्यूची घोषणा कुणी करत असेल तर तुमच्यापुढे, 'मी मेलेलो नाही' अशी नवी घोषणा करण्यावाचून पर्याय उरत नाही. कवी जिवंत असला की बाकी सर्वच जिवंत राहते असा माझा अनुभव आहे.

माझा बाप जगण्यासाठी गाव सोडून मुंबईला आला. बारा गावे फिरला आणि शेवटी कोल्हापुरात काही काळ स्थिरावला. पुन्हा आपल्या गावात परतला. मीही जगण्यासाठी मुंबईत आलो आणि मुंबईत स्थिरावलो. सततची भटकंती हे आमचे पिढीजात वैशिष्ट्य. माझा बाप पेन्टर होता. कामगार होता. मग ऐसपैस तालेवार व्यापारीही झाला. व्यापारात बुडाला आणि पुन्हा दरिद्री झाला. त्यामुळे एक असा स्थिर वर्ग मला लाभला नाही. श्रीमंत, मध्यम आणि दरिद्री अशा तिन्ही वर्गांत माझी स्थित्यंतरे होत राहिली. मात्र ज्या वयात जडणघडण होते ते वय मात्र दारिद्र्याशी निगडीत असल्याने माझी 'नाही रे' वर्गाशी असलेली बांधिलकी कायमच टिकली. माझ्या आईने स्वतःला कायम गावाशी जोडून ठेवले आणि आमची गावाशी असलेली नाळ कधीच तोडू दिली नाही. ती माझे नेहमीच प्रेरणास्थान बनून राहिली. तिची गडद छाया माझ्या आयुष्यावर आणि कवितेवर नेहमीच राहिली. माझ्या आयुष्यात माझी फॅमिली हीच काहीशी स्थिर बाब; पण ही

स्थिर गोष्टही मी मुंबईत आल्यावर माझ्याजवळ राहिली नाही. फॅमिली गावात आणि मी मुंबईत हे अंतर आजही आहेच.

माझ्यावर सर्वाधिक प्रभाव पडला तो कोल्हापूर आणि मुंबईचा. मीही माझ्या वडिलांप्रमाणे मुंबईत आलो. ह्या महानगरीच्या प्रथम दर्शनी प्रेमात पडलो. फिल्म इंडस्ट्रीत करिअरसाठी स्ट्रगल करू लागलो. तरीही कोल्हापूरची ओढ थोडी शिल्लक राहिलीच. मुंबईतून कोल्हापुरात गेलो तेव्हा कोल्हापुरात जुन्या बिल्डिंगा पाडून नव्या उभारण्याचे प्रकरण मोठ्या प्रमाणात सुरू झालेले. जिथे राहिलो तीही घरे पडायला लागलेली, त्यामुळे अक्षरशः इथे आपले काही नाही असा फील. डोळ्यादेखत कोल्हापूर कॉस्मॉपालिटन व्हायला लागलेले. हे कोल्हापूर नव्याने कात टाकणारे. एकीकडे मुंबईत आपण भाडेकरूच असल्याचा फील तर दुसरीकडे कोल्हापुरातून पूर्ण उखडले गेलेलो. मुंबईने होस्टेल, चिंचपोकळी, डोंबिवली असे घुमवत शेवटी पार दहिसर मीरारोडला नेले. दर अकरा महिन्यांनी घरात चेंज. घर चेंज. जुने स्टेशन तोडायचे. नवे जोडायचे आजही हे चालूच.

फॅमिली दूर. मुंबईत आपण एकटे. अशावेळी सोबत फक्त मित्र आणि मैत्रिणी. मित्रांनी गळा कापण्याची एकही संधी सोडली नाही. काम करून घ्यायचे पण क्रेडिट द्यायचे नाही हे रुटीनच. अशा वेळी काही मैत्रिणी भेटल्या. होस्टेलला राहताना कोरेपण अंगावर येणारे. माझ्या संपूर्ण आयुष्यावर विवेकानंद, गांधी, शाहू, फुले, आंबेडकर ह्यांचा प्रचंड प्रभाव. त्यामुळे एकीकडे मोक्षाची, निर्वाणाची आच तर दुसरीकडे वासना. लग्न हवे आणि नकोही. दोन-दोन 'मी'–एकाला ब्रह्मचर्य हवे तर दुसऱ्याला लग्न. नंतर तिसराही 'मी' निर्माण झाला. त्याला लग्न नको पण एकत्र राहायला हवे. ह्या तिघांच्यात सतत झगडा. दुसऱ्यामुळे एक इन्स्पेक्टर मैत्रीण आयुष्यात आली आणि गेली. तिसऱ्याने नंतर एक भलतीच मुलगी जवळ केली. पूर्ण कॉस्मॉपॉलिटन व्यक्तिमत्त्व. अत्यंत बुद्धिमान आणि चंचलही. नेमका ह्याचवेळी मला ब्रह्मानुभव. त्यामुळे एक आणि तिसरा द्वंद्व सुरू. आसपास तर फ्रीसेक्सचा कहर. एके ठिकाणी साक्षात बहीण भावाचेच संबंध बघितले. त्यातून मनात अनेक प्रश्न. दुसरीकडे मैत्रिणीबरोबर काही सुंदर, ट्रान्सटेक्चुअल क्षण. पुढे ह्या मैत्रिणीबरोबर लग्न न करता एकत्र राहण्याचा अमेरिकन प्रयोग. माझा स्ट्रगल आणि तिचा स्ट्रगल. प्रेम संपले. मग तिसऱ्या माणसाचे आगमन, त्यातून निर्माण होणारे प्रश्न आणि हे सगळे पाहणारा तटस्थ-त्रयस्थ पहिला 'मी'. आरोप-प्रत्यारोप, उपकार केल्याची तिच्या मनात वाढत चाललेली भावना. माझ्यातल्या स्वाभिमानाचा प्रेमाशी चाललेला संघर्ष. मी यशस्वी होणे शक्यच नाही असे तिला वाटणे, त्यातच तिचा वाढत चाललेला गिल्ट अप एरिया, माझा नाकाम होणारा स्ट्रगल आणि शेवटी ह्या सगळ्यातून बाहेर पडण्याचा झालेला निर्णय. अमेरिकन प्रयोगाची अमेरिकन ट्रेजेडी शेवटी कुणीतरी अमेरिकेत सेटल होण्याचा निर्णय

घेतल्यानंतर संपली. पुढे ॲड-एजन्सीची उभारणी. वेगवेगळ्या येणाऱ्या मॉडेल्स, कॅमेरे आणि फॅशन्स. पुढे पुन्हा एक मोठे इवेंट. मॅनेजमेंटचे काम. सारी पुण्याई पणाला लावलेली, गुजरातमध्ये भूकंप आणि मी पुन्हा रस्त्यावर.

हे सर्व घडत असताना गावाशी नाते होतेच. अनेक गावांत; विशेषतः कोल्हापूर परिसरात अनेक बदल घडत होते. पावसाळा, दुष्काळ हे सगळे एकत्रच नांदणारे! मुंबईतून नागेशीकडे गेल्यावर झाडाला झाड म्हणून बघणारा 'मी' हळूहळू बदलत होतो. एखादे लॅण्डस्केप बघावे तसा झाड बघायला लागलो. आपली दृष्टी करप्ट होतीये म्हणून हादरलोही. आजही गावातली माझी आई हीच मला ही दृष्टी शुद्ध करायला मदत करते. मी तिच्याकडे परततो तेव्हा पुन्हा विशुद्धतेत परततो. तिचे निसर्गाशी असलेले नाते अभूतपूर्व आहे.

मी ज्या कोल्हापुरात वाढलो ते छत्रपती शाहूंचे शहर ! परिवर्तनवाद हा ह्या भूमीचा स्थायी स्वभाव आहे. कुठल्याही कोल्हापूरकराप्रमाणे मीही मारामाऱ्या केल्या, कुस्त्या खेळलो. आजही फुटबॉल, क्रिकेट आणि बुद्धिबळात मला कवितेइतकाच रस आहे. माझ्या मित्रांनी 'कार्पोव्ह चेस क्लब' काढला आणि ह्यांच्या नादाने मी प्रथमच बैठा खेळ खेळू लागलो. पुढे ह्या संघटनेचे काम वाढले व शेवटी आंतरराष्ट्रीय बुद्धिबळ स्पर्धा आयोजित करण्यापर्यंत धडक मारली गेली. ग्लोबलायझेशनशी झालेला हा पहिला पुसट परिचय. पुढे हा परिचय वाढतच गेला. एका महाविद्यालयीन वक्तृत्व स्पर्धेत मला आठवते, जवळ जवळ प्रत्येक वक्ता हा मार्क्सवादाच्या विरोधात बोलला होता. खरेतर, मार्क्सवाद तिथेच प्रथम कोसळला आणि मग गार्बोचेव्ह सत्तेवर आले आणि तो पुरताच कोसळला. माझे वडील व्यापारी, त्यामुळे धंदा करतानाच मार्क्सवाद कोसळणार हे त्यांना उमगलेले. आमचे दुकान नेमके जेलच्या समोर. ह्या परस्परसंबंधात एक वेगळीच रस्सीखेच शेवटी जेलमधला मार्क्सवाद दुकानाकडून पराभूत झाला आणि मार्केट माझ्या आयुष्याकडे थेट चालत आले. रजनिशांच्या 'समाजवादसे सावधान' ह्या पुस्तकाने मला बरेच सावधान केले. मी ज्या विवेकानंद, फुले, आंबडेकर ह्यांना आदर्श मानायचो ते सर्व समाजवादी आणि समाजवादावरचा माझा विश्वास पूर्ण उडालेला. मार्क्सवादाची ही पडझड माझ्या अनेक कवितांत उमटलीये. आसपासचे सारे मित्र सेट्ल झालेले. काही कस्टम ऑफिसर झाले तर काही आय.ए.एस. वगैरे! मित्रांना परिवर्तनावर विश्वास असूनही सेट्ल होण्याचे वेध लागलेले होते. मी मुंबईत १९८९ला आलो तेव्हा अर्थव्यवस्था खुली व्हायला लागलेली. कमोडिटीज म्हणजे वस्तूंनी हे शहर भरायला लागलेले त्यामुळे निर्वस्तुवादी होऊन ह्या वस्तू नाकारायला तरी हव्यात किंवा ह्यांचे संगणक, टीव्ही आपण फोडायला हवेत असे वाटायचे. कारण माझं दारिद्र्य. ह्या काळात नव्या आणि नवीन मुंबईचे बांधकाम चालू झाले. ही एक नवीन मयसभा होती आणि माझे बूड मात्र कुठेच स्थिर नव्हते. इथून तिथे तिथून इथे

केवळ भटकभवाना व्हायरस. सगळेच नुस्ते खेळासारखे–हिस्ट्रीऐवजी मीथ. ह्या मीथच्या आधारे रामजन्मभूमीसारखे प्रश्न, आयडियालॉजीऐवजी चॅनेल रिलेशनशिपमध्येही निगोसियेशन अशी सगळी रिप्लेसमेंट. एक पार्टी अज्ञ तर दुसरी ज्ञानाचे ॲपल सतत खाणारी (ही कविता मुळात 'खेळ' म्हणूनच डिझाईन केलेली. ठोकळे टाकत दोन पार्ट्यांनी सुरुवात करायची. म्हणजे अज्ञवर असताना प्रथम चार पडले तर तो एकट्याने तिथून तीन पडून रेकत वर आला तर त्याचे नशीब. मग दोन पडले तर त्याची हिस्ट्री डेड. तिथून वाचला, तीन पडले तर अः वर, दोन पडले त्याची मिथ विजयी. ज्याच्या जितक्या डेड तितके त्याला मायनस, जितक्या विजयी तितके प्लस, जो एन्लाइटन्मेंटला पोहचेल तो सर्वात जास्त विजयी, त्याला दसपट गुण) ह्या सगळ्या पसाऱ्यात 'क्रांती' वरचा विश्वास उडाला. एक नवीन ना डावी ना उजवी माणसाला समग्र पाहणारी परिर्वतनवादी भूमिका मला आवश्यक वाटायला लागली. अर्थात परिवर्तनवादाचे प्रतिनिधीही ह्याला जबाबदार होतेच. मात्र तरीही परिवर्तनवाद्यांचे अपयश हे उज्ज्वलच होते असे माझे मत आहे. मुळातच परिवर्तनवाद्यांनी हा काळ बदललाय हे स्वीकारायला पाहिजे. हा काळ चिन्हवस्तूंचा (मी त्यांना इंग्लिशमध्ये semiodities 'सेमिओडिटीज' म्हणतो.) म्हणजे टीव्ही, संगणक, वॉशिंग मशीन वगैरे प्रोग्राम्ड वस्तूंचा आणि माणूस आणि त्यांच्यात निर्माण झालेल्या चिन्हसृष्टीचा काळ आहे. ह्या चिन्हसृष्टीने विश्व, सृष्टी व प्रतिसृष्टी (ही कमोडिटिमुळे साकार होते) ह्यांचाही अवतार बदलून टाकला आहे. ह्या बदलांमुळे जगात बरीच उलथापालथ झालेय. एकीकडे प्रतिसृष्टीय विचारप्रणाल्यांचा मृत्यू तर दुसरीकडे नवीन महाजालांचा उदय. एकीकडे आधुनिक व उत्तरआधुनिकतेचा अस्त तर दुसरीकडे जागतिकीकरणाचा उदय अशा अनेक उलथापालथींचा हा कालखंड आहे. नवीन झालेले हे बदल न झेपल्यामुळे अनेक ठिकाणी धर्मवाद व दहशतवाद ह्यांचा झालेला सुळसुळाट हेही ह्याच कालखंडाचे वैशिष्ट्य आहे असे मला वाटत होते. दुर्दैवाने मराठी कलावंत, विचारवंत आणि समाजकारणी ह्यांना अद्यापही हे बदल पचवता आलेले नव्हते. त्यामुळे एकीकडे साम्यवाद, समाजवाद, फुले-आंबेडकरवाद वगैरे प्रतिसृष्टीमुळे जन्माला आलेल्या विचारप्रणाल्यांच्या आधारे ह्या बदलांना नाक मुरडणे चालू तर दुसरीकडे उत्तर आधुनिकतेला बायबल मानून उसनवारीतून आणि आंधळ्या अनुकरणातून ह्या बदलांना स्मार्ट नजरेने कलरफूल पाहणे चालू होते. जणू ह्या काळात भारतीयांनी आपला दार्शनिक आत्मविश्वास पार गमावला आहे असे वाटण्याइतपत लोक एकतर प्रतिक्रियावादी किंवा अंधानुकरणवादी झाले होते. मी ह्या काळात विश्व, सृष्टी, प्रतिसृष्टी आणि चिन्हसृष्टी ह्यांना समग्र पाहण्याची धडपड करत होतो. मार्गी आणि देशी अशी दोन टोके टाळून मार्गी, देशी, पोटी आणि जमाती ह्यांची एकात्मिक मांडणी करत होतो. मार्गी आणि देशी ह्यांची टोके पकडली की त्यांचे रूपांतर

पोपटपंचीत होते. मला पोपटपंचीत रस नव्हता. भारतात अध्यात्म आणि परिवर्तन ह्यांची सांगड घालूनच गौतम बुद्ध, महावीर, अष्टावक्र, ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, गुरु नानक, कबीर, फुले, विवेकानंद, पेरीयार, शाहू, गांधी, आंबेडकर, रजनीश आणि कृष्णमूर्ती ह्यांनी परिवर्तन घडवले होते. आपणही आपल्या काळानुसार अशी नवीन सांगड घालून त्यांचा 'बहुजन हिताय बहुजन सुखाय' (खरेतर 'सर्वजन सुखाय सर्वजन हिताय' असा बदल मी सुचवेन) हा मूलमंत्र जोपासत वाटचाल करायला हवी असे मला वाटत होते. माझ्या आसपास परिवर्तनाच्या जुनाट प्रोग्राम्सचेच रिपीट टेलिकास्ट चालले होते आणि आपण ज्यांचा वारसा सांगतोय ते सतत बदलणाऱ्या वास्तवाचे सूक्ष्मदर्शी अभ्यासक होते हेच अनेक जण विसरले होते. धर्मांधता, सत्तांधता, विचारांधता आणि कर्मठपणा परिवर्तनवाद्यांच्यातही बोकाळला होता त्यामुळे कवी म्हणून हा कालखंड अधिकच आव्हानांचा होता.

१९९० नंतर खोमेनींची राजवट स्थिरावली. हा बदल रशियात गार्बोचेव्ह आले ह्या बदलाइतकाच महत्त्वाचा होता. भारतातही शहाबानो प्रकरणाने खोमेनी राजकारणाची सुरुवात केली. त्याला प्रतिक्रिया म्हणून रामजन्मभूमी आंदोलन सुरू झाले. हिंदू प्रथमच 'हिंदुत्ववाद' ह्या ब्रॅण्डखाली संघटित झाले. गांधींचे महत्त्व पुन्हा अधोरेखित झाले. मला स्वतःला एका कवितेवरून मूलतत्त्ववाद्यांना सामोरे जाण्याची वेळ आली. जिच्यावर विश्वास टाकला त्या व्यक्तीनेच दगा फटका दिला. ह्या प्रकरणाने माझ्या प्रेमप्रकरणाचा आणि अमेरिकन प्रयोगाचा पुरता फज्जा उडवला. अमेरिकन प्रयोगात हिंदुत्ववाद्यांचा हल्ला गृहीत धरला नव्हता. ह्या अतिरेकी हल्ल्यात माझ्या संसाराचे ट्वीन टॉवर्स उद्ध्वस्त झाले.

माझ्या ह्या सर्व भटकंतीत एक गोष्ट मात्र माझ्यात होती ती म्हणजे 'अध्यात्म'. अगदी दिल्ली रेल्वे स्टेशनवरही माझ्यात एक बुद्ध जन्मेल असेच मला वाटत होते. ईश्वरावर विश्वास नव्हता पण पुन्हा मुक्ती देण्याचे पसायदान मागावेसे वाटत होते. अर्थात भय, सुरक्षिततेची आच ह्यांच्या धुळीने मी सतत माखलेला होतो. अनप्रेग्नंट आणि पॅरालिसिस झालेली ही अवस्था. स्क्रीन शोधावी तिथे स्क्रीन; मग मी प्रेग्नंट कसा होणार ? ज्या वारकरी परंपरेवर विश्वास दाखवायचा ती स्वतःच एक एपिसोड बनलेली. संपूर्ण समाजात विठ्ठलाऐवजी साईबाबांची स्थापना. मी शिर्डीच्या अनेक यात्रा केल्या पण मला शिर्डी मानवली नाही. फक्त ह्या यात्रांची एक कविता झाली. जिथे टीव्हीच्या ॲडिक्शनमधूनही मुक्ती नाही तिथे कसले निर्वाण ? कसला मोक्ष ? एकदा आमच्या मित्राने तयार केलेल्या फ्लूमवर डॉक्युमेंटरी करायची म्हणून बसलो होतो. तेव्हाही जाणवला तो दुष्काळच. आध्यात्मिक पाण्याचे इरिगेशन नाही मग फिल्ममध्ये अभिनयाचा फापटपसारा येईल नाही तर काय ? कधीमधी असेही वाटायचे की हा गॉड ही सुद्धा कवीचीच निर्मिती. खरेतर जवळजवळ माझ्या सर्वच कवितांचा शेवट अपरिहार्यपणे आध्यात्मिकच होतो. असे का ह्या प्रश्नाचे उत्तर माझ्याजवळ नाही.

अशी ही यात्रा ! वेगवेगळ्या चॅनेल्समधून मांडलेली ! भटकंती आजही चालूच आहे– एकटी आणि एकाकी. एकाकी माणसाला टीव्ही हा सध्या मोठा आसरा. मग टीव्हीचे दर्शकत्व, टीव्हीचे अभंग. हा टीव्ही व्यवस्थेला शरण जायला लावतो हे लक्षात आल्यावर मुक्ततेचा प्रयत्न. टीव्ही आणि कव्ही !

कधी कवी, कधी फक्त आईचा मुलगा, कधी नागरीक तर कधी साधक म्हणून मग वेगळी चॅनेल्स. 'यात्रा' ह्या चॅनेलमध्ये चार दीर्घकविता दिल्यात. त्यांतील 'आमदारपुत्र आणि शहनाज डार्लिंग' ही प्रेमाची यात्रा. माझे मामा आमदार होते त्यामुळे आमच्या कुरेपास वाड्यावर छोट्या छोट्या प्रकरणांचीही प्रचंड राजकीय धूळ उडते त्याचा संदर्भ तिला आहे. 'बांधकाम चालू आहे' ही मुंबई शहरातली यात्रा आहे तर 'तू गेल्यानंतर'मध्ये एका स्ट्रगलरच्या दिवसाची यात्रा आहे. 'साईबाबा डॉट कॉम'मध्ये शिर्डीची यात्रा आहे.

१९८२ ते २००३ ह्या कालखंडात मी जवळ जवळ सातशे कविता लिहिल्या. त्यांतील निवडक कवितांचा हा संग्रह आहे. हा संग्रह माझे आत्मचरित्र नाही. ही कविता माझ्या काळाचे, माझ्या अवकाशाचे चरित्र व फॅन्टसीही आहे. कवी हा कवितेत केवळ स्वतःचे चरित्र रचत नसतो तर तो स्वतःबरोबर स्वतःच्या काळाचे, स्वतःच्या अवकाशाचे चरित्र आणि स्वतःची, स्वतःच्या काळाची, स्वतःच्या अवकाशाची फॅन्टसीही रचत असतो. ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, ह्यांची कविता ही त्यांचे चरित्र आहेच पण ती 'विठ्ठल' नावाच्या फॅन्टसीलाही रचत जाते. विठ्ठलाहून सर्वात मोठी फॅन्टसी काय असू शकते? कविता केवळ आत्मचरित्रात्मक व्हायला लागली की आत्मचरित्र हे कवितेचे कच्चे मटेरियल व्हायला लागते आणि कवी प्रत्यक्ष जगण्यापेक्षा प्रत्यक्षावर लिहिणेच महत्त्वाचे समजायला लागतात. काहीवेळा तर आपले चरित्र एकाच अनुभवाचे रिपीट टेलिकास्ट असते. कविताही तेच तेच अनुभव रिपीट करायला लागते. मग कवितांचा पहिला खंड आकर्षक आणि दुसरा रिपीट टेलिकास्ट. त्याच त्याच अनुभवांची गुंतवळ. बोअरडमचा शिळा रगाडा. सर्वच कवींची चरित्रे काही भन्नाट नसतात पण त्यांच्या फॅन्टसी भन्नाट असू शकतात. जर तुम्हाला दुसऱ्यांचा अनुभव मांडता येत नसेल व फॅन्टसी रचता येत नसेल तर प्रतिभा काय कामाची ?

काहीवेळा आपला अनुभव आपला राहतच नाही. उदा. 'ते' ह्या कवितेतील 'तो' एक सिनेमाचा एलीट समाजातला दिग्दर्शक. त्याने माझी एक पटकथा ऐकली आणि ऐनवेळी माझे क्रेडिट माझी परिस्थिती ओळखून डीलीट केले. हे सरळ सरळ गरिबीचा फायदा घेऊन केलेले शोषण होते आणि तो एलीट असल्यानेच ते शक्य झाले. कवितेची सुरुवात त्यामुळे तशी झाली पण नंतर कवितेतील आवाज समस्त 'डीलीट' समाजाचा झाला. अशा वेळी त्या आवाजाला चरित्राचे कुंपण कोण घालणार ? फॅन्टसी ही जीवनापासून तुटली की प्रॉब्लेम होतो. गांधी आंबेडकरांनी

जे स्वप्न पाहिले ती फॅन्टसीच होती पण ती जीवनाशी निगडीत असल्याने आपण त्यांना महामानव म्हणतो. ज्याची फॅण्टसी जीवनापासून तुटते तो वेडा होतो. अशा वेड्या कविता हा प्रॉब्लेम होऊ शकतो. चांगली फॅन्टसी ही कवीचे विद्यापीठ खुले ठेवते तर फॅन्टसीचा अभाव चांगले विद्यापीठही मोडकळीला आणतो.

कविता ही अनुभवाचे मायक्रोनेट असते तर कवितासंग्रह मॅक्रोनेट. हा संग्रह म्हणजे एक मॅक्रोनेटच आहे. बृहद्जाल आहे.

२१ मार्च २००४ — श्रीधर तिळवे

मुंबई

## ऋणनिर्देश

ह्या कविता प्रसिद्ध केल्याबद्दल 'तुम्ही, आम्ही आपण सगळेच' 'सौष्ठव' 'शब्दवेध', 'अनुष्टुभ', 'भलेरी', 'महाराष्ट्र टाइम्स' ह्या पत्रिकांचे वा अंकांचे आभार. विशेषतः अविनाश धर्माधिकारी ह्यांच्याशी टोकाचे मतभेद असूनही त्यांनी जो वैचारिक खुलेपणा आणि मोकळीक ठेवली त्याबद्दल त्याचे आभार. माझ्या कवितांची दीर्घ वा छोटी समीक्षा करणाऱ्या प्रभाकर बागले, अभिजित देशपांडे, नितीन रिंढे, वसंत आबाजी डहाके, दिलीप लाठी, जी. के. ऐनापुरे, नितीन रिंढे ह्यांचे मनापासून आभार. मला मुंबईत काव्यवाचनाची संधी देणाऱ्या केशव मेश्राम यांचेही आभार.

इतके मोठे पुस्तक येईल अशी मला शक्यता वाटत नव्हती. रामदास भटकळ ह्यांनी कसलीही दुरान्वयानेही ओळख नसताना माझा पहिला कवितासंग्रह स्वीकारून मला सुखद धक्का दिला होता. आता इतका मोठा काव्यसंग्रह प्रकाशित करून त्यांनी मला दुसरा मोठा सुखद धक्का दिला आहे. त्यांचे व ह्या संग्रहासाठी मनापासून खूप मेहनत घेतलेल्या अस्मिता मोहिते ह्यांचा मी ऋणी आहे. त्याबरोबरच पॉप्युलरमधील मेघा भगत, संगीता रायकर वगैरेंच्या मदतीशिवाय हा संग्रह निघणे शक्यच नव्हते. त्यांचे व ह्या संग्रहाचे यशस्वी मुद्रण ज्यांच्यामुळे शक्य झाले त्या सर्वांचा मी ऋणी आहे.

ह्या संग्रहाला आवश्यक असे मुखपृष्ठ षांताराम पवार ह्यांनी करून दिले त्याबद्दल त्यांचेही आभार. माझ्या सर्व बहीणभावांचा, मित्रांचा, आप्तांचा मी नेहमीच ऋणी होतो व आहे. सर्व तिळवे व नाईक परिवाराचा मी ऋणी आहे.

२१ मार्च २००४ **श्रीधर तिळवे**
मुंबई

*अनुक्रम*

## ‘गज़ल’ चॅनेल



## ‘कविता’ चॅनेल

**'गांधी' चॅनेल**

नव्वदचे दशक जागतिकीकरणाचे, उदारीकरणाचे,
माध्यमक्रांतीचे, विचारसरणींच्या अंतांचे व
उलथापालथींचे, आंतरराष्ट्रीय दहशतवादाचे,
अंतर्गत यादवीचे दशक आहे. मानवी अनुभवाची
परिमाणेच या दशकाने बदलून टाकली. या
आव्हानांना कलावंत म्हणून सामोरी जाणारी
श्रीधरची कविता ही मराठीतली पहिली
कविता आहे.

श्रीधरच्या कवितेत निसर्ग आहे, प्रेम आहे,
प्रेयसी आहे, आई-बाप-कुटुंब-संस्कृती (मराठी
माणसाच्या भावविश्वातले) हे सगळे आहे. पण
तसे नाही, जसे आपण आजतागायत मराठी
कवितांत वाचत आलोय, जे आपल्या सवयीचे
आणि साच्याचे झालेय.

व्यक्त करायचा तो आशय आणि ज्यातून व्यक्त
व्हायचे ते भाषा हे माध्यम — या दोहोंतली
'चिन्हसंस्कृती'. चिन्हांचा खेळ — या कवितेला
स्पष्टच उमजलाय. आणि याला उत्तर म्हणून ही
कविता कधी 'निर्वस्तुवाद' घोषित करते तर कधी
'क्रियावाद'. उत्तर-आधुनिकाच्या जंजाळात
ती अडकत नाही.

तत्त्वज्ञानाची उत्तम बैठक आणि समकालीन
सजगता ही श्रीधरच्या कवितेची बलस्थाने आहेत,
ती कळली तरच श्रीधरची कविता कळेल.

अभिजित देशपांडे

किंमत
रुपये २००.००

(म-९९२)
ISBN 81-7185-827-9